मिडीया मॉनिटरिंग सेंटर उभारणीस
मान्यता देण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्रमांक वानियो-२०११/प्र.क्र.२१९/का.३४.
मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२.
दि.३० सप्टेंबर, २०११

**प्रस्तावना:**

केंद्र शासनाच्या माहिती व प्रसारण खात्यामार्फत नवी दिल्ली येथे तसेच उत्तर प्रदेश, गुजरात इत्यादी राज्य सरकारनी त्या-त्या राज्यांमध्ये इलेक्ट्रॉनिक मिडियाद्वारे प्रसारीत होणाऱ्या कार्यक्रमांवर निगराणी ठेवण्यासाठी मिडिया मॉनिटरिंग सेंटर ही यंत्रणा उभारली आहे. त्या धर्तीवर महाराष्ट्रातही अशी यंत्रणा स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यावर पुढील निर्णय घेण्यात आलेला आहे.

**शासन निर्णय**

महाराष्ट्रात वरील राज्यानुसार मंत्रालयात मिडीया मॉनिटरिंग सेंटर स्थापन करण्यास व त्यासाठी येणाऱ्या रु.१०.०० लाख इतक्या खर्चास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रस्तुत प्रकरणीचा खर्च सामान्य प्रशासन विभाग, मागणी क्र.ए-६, २२२०-माहिती व प्रसिध्दी, १०९-छायाचित्र सेवा पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजना (००)(०१) छायाचित्र सेवा (२२२००४१९) १३-कार्यालयीन खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०११-१२ या आर्थिक वर्षात मंजुर अनुदानातून नियोजन व वित्त विभागाच्या मान्यतेने भागविण्यात यावा.

३. सदर आदेश वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१६.५.२००९ अन्वये निर्गमित केलेल्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग पहिला, उपविभाग-तीन, अनुक्रमांक ४, नियम क्र.२७(२) अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.com या वेबसाईडवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक क्रमांक २०११०९३०१०२८२९००१ असा आहे.

महाराष्ट्राच्या राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**(आ. म. लुडबे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रती,**

महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय,मुंबई-३२
महालेखापाल, महाराष्ट्र १, (लेखा व अनुज्ञेयता/(लेखा परीक्षा) / मुंबई.

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परीक्षाअधिकारी, मुंबई
कक्ष अधिकारी,नियोजन विभाग/वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
उप संचालक (लेखा) माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२
लेखा अधिकारी,माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२
**निवड नस्ती /३४**